केंद्र शासनाच्या धर्तीवर दिव्यांगत्त्वासंदर्भातील सर्व लाभ मिळविण्यासाठी वैश्विक ओळखपत्र **(Unique Disability Identity Card-UDID Card) बंधनकारक करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**दिव्यांग कल्याण विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांक : दिव्यांग-२०२४ / प्र. क्र. ८६ / दि. क. २**
३१, ३२, ३५ "ए" विंग, मित्तल टॉवर,
बॅरिस्टर रजनी पटेल मार्ग, नरिमन पॉईंट, मुंबई- ४०० ०२१.
दिनांक :- २७ जून, २०२४.

**वाचा :**

१) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय, क्रमांक : अप्रवि-२०१८/प्र. क्र.४६/आरोग्य-६, दिनांक १४ सप्टेंबर, २०१८,
२) केंद्र शासन, सामाजिक न्याय व अधिकारिता मंत्रालय, दिव्यांगजन सशक्तीकरण विभाग, कार्यालयीन ज्ञापन क्रमांक : P-13013 / 23 / 2023 - UDID / IT / STATISTICS, दिनांक ३ मार्च, २०२३,
३) दिव्यांग कल्याण विभाग, शासन परिपत्रक, क्रमांक : दिव्यांग-२०२१ / प्र. क्र. ४५ / दि. क. २, दिनांक ८ मार्च, २०२३.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम, २०१६ ची राज्यात प्रभावी अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने २१ प्रकारच्या दिव्यांगत्त्व प्रकारांवरील दिव्यांगत्त्व प्रमाणपत्रे उपलब्ध व्हावीत, यासाठी केंद्र शासनाने निर्गमित केलेली मार्गदर्शक तत्त्वे, कार्यपद्धती व अपिल पद्धती याबाबतच्या सविस्तर सूचना सार्वजनिक आरोग्य विभागाच्या दिनांक १४ सप्टेंबर, २०१८ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आलेल्या आहेत.

२. केंद्र शासन, सामाजिक न्याय व अधिकारिता मंत्रालय, दिव्यांगजन सशक्तीकरण विभागाच्या दिनांक ३ मार्च, २०२३ च्या कार्यालयीन ज्ञापनान्वये, शासनाकडून दिव्यांगांसाठीच्या विविध योजनांचा लाभ मिळण्यासाठी वैश्विक ओळखपत्र (UDID Card) अनिवार्य करण्यात आलेले आहे.

३. तसेच दिव्यांग कल्याण विभागाच्या दिनांक ८ मार्च, २०२३ च्या परिपत्रकान्वये, दिव्यांग व्यक्तींना दिव्यांगत्त्व प्रमाणपत्र वितरण करण्याच्या प्रक्रीयेस गतिमानता येण्यास व केंद्र शासनामार्फत ठरवून दिलेले १००% ध्येय गाठण्यास तसेच महाराष्ट्र राज्याची कामगिरी उंचावण्यासाठी दिव्यांगत्त्व प्रमाणपत्र व वैश्विक ओळखपत्र (UDID Card) देण्याच्या विशेष मोहिमेस दिनांक ३० जून, २०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

४. सबब केंद्र / राज्य शासनाकडून राबविण्यात येणाऱ्या दिव्यांगांसाठीच्या विविध योजनांचा लाभ मिळण्यासाठी राज्यातील दिव्यांगांसाठी वैश्विक ओळखपत्र (UDID Card) अनिवार्य करण्यासंदर्भात सविस्तर सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :**

केंद्र / राज्य शासनाकडून राबविण्यात येणाऱ्या दिव्यांगांसाठीच्या विविध योजना / नोकरी मधील आरक्षण / पदोन्नती / सवलती इ.चा लाभ मिळण्यासाठी राज्यातील दिव्यांगांसाठी वैश्विक ओळखपत्र (UDID Card) अनिवार्य करण्यासंदर्भात खालीलप्रमाणे सविस्तर सूचना निर्गमित करण्यात येत आहेत.

१) केंद्र / राज्य शासनाकडून राबविण्यात येणाऱ्या दिव्यांगांसाठीच्या विविध योजना / सवलती इ.चा लाभ मिळण्यासाठी राज्यातील दिव्यांगांसाठी वैश्विक ओळखपत्र (UDID Card) अनिवार्य करण्यात येत असून ज्या दिव्यांगांकडे कोणतेही दिव्यांगत्त्व प्रमाणपत्र नाही, त्यांनी सार्वजनिक आरोग्य विभागाच्या दिनांक १४ सप्टेंबर, २०१८ च्या शासन निर्णयान्वये / भविष्यात वेळोवेळी स्थापन करण्यात आलेल्या / येणाऱ्या वैद्यकीय मंडळामार्फत दिव्यांगत्त्व प्रमाणपत्र व वैश्विक ओळखपत्र (UDID Card) प्राप्त करून घेणे अनिवार्य आहे.

२) ज्या दिव्यांग व्यक्तींकडे सार्वजनिक आरोग्य विभागाच्या दिनांक १४ सप्टेंबर, २०१८ चा शासन निर्णय निर्गमित होण्यापूर्वी शासनाने नेमून दिलेल्या सक्षम प्राधिकाऱ्याने दिलेले दिव्यांगत्त्व प्रमाणपत्र आहे, त्यांनी उक्त शासन निर्णयान्वये स्थापन करण्यात आलेल्या वैद्यकीय मंडळामार्फत दिव्यांगत्त्व प्रमाणपत्र व वैश्विक ओळखपत्र (UDID Card) प्राप्त करून घेणे अनिवार्य आहे. वैश्विक ओळखपत्र (UDID Card) प्राप्त करून घेण्यासाठी नोंदणी केल्यानंतर प्रत्यक्षात सदर ओळखपत्र प्राप्त होईपर्यंतच्या कालावधीसाठी संबंधित दिव्यांग व्यक्तींना दिव्यांगत्त्वाच्या सवलती / योजना यांचा लाभ घेण्यासाठी त्यांचेकडे असलेले दिव्यांगत्त्व प्रमाणपत्रासोबत वैश्विक ओळखपत्रासाठीचा नाव नोंदणी क्रमांक (Enrolment Number) सादर करणे अनिवार्य राहील.

३) ज्या दिव्यांग व्यक्तींकडे शासनाने वेळोवेळी नेमून दिलेल्या सक्षम प्राधिकाऱ्यांनी दिलेले दिव्यांगत्व प्रमाणपत्र नसेल, तथापि त्यांचेकडे शासकीय रुग्णालयांमधून दिलेले अन्य वैद्यकीय/दिव्यांगत्त्व प्रमाणपत्र असेल व त्या आधारे जर ते दिव्यांगांसाठीच्या सवलती / योजना यांचा लाभ घेत असतील, तर अशा दिव्यांग व्यक्तींना सदर शासन परिपत्रकाच्या दिनांकापासून एका वर्षाच्या मुदतीत सार्वजनिक आरोग्य विभागाच्या दिनांक १४ सप्टेंबर, २०१८ च्या शासन निर्णयानुसार / भविष्यात वेळोवेळी स्थापन करण्यात आलेल्या / येणाऱ्या वैद्यकीय मंडळाकडून दिव्यांगत्त्व प्रमाणपत्र / वैश्विक ओळखपत्र (UDID Card) प्राप्त करून घेणे अनिवार्य राहील. जे दिव्यांग व्यक्ती उक्त मुदतीनंतरसुद्धा सदर प्रमाणपत्र प्राप्त करून घेणार नाहीत, ते दिव्यांगांसाठीच्या सवलती / योजना इ. लाभ मिळण्यास पात्र राहणार नाहीत.

२. तरी सर्व मंत्रालयीन विभाग / त्यांचे प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग / कार्यालये त्याचप्रमाणे सर्व स्थानिक स्वराज्य संस्था यांना सूचित करण्यात येते की, त्यांनी उक्त सूचना त्यांचे नियंत्रणाखालील संबंधित दिव्यांग कर्मचाऱ्यांना द्याव्यात, तसेच त्यांचेकडून सदर सूचनांचे काटेकोरपणे पालन होत असल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

३. तसेच आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांना सूचित करण्यात येते की, सदर सूचना राज्यातील सर्व दिव्यांग व्यक्तींच्या निदर्शनास आणण्याच्या दृष्टीने त्यांनी या परिपत्रकास उचित प्रसिद्धी देण्याबाबत कार्यवाही करावी.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०६२७१३१९५३४०३५ असा आहे. तसेच सदर शासन परिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

VISHNUDAS PUNDLIKRAO GHODKE

Digitally signed by VISHNUDAS PUNDLIKRAO GHODKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPT., 2.5.4.20=514c2e5ad6ac71c69b99a86a5fe5189556b7a95d5896bbb81496f403bb58ac3e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9AB69D6945F8950A9525831F8AE9726BE295D17576E78D19FA8F6CB952BB04A0, cn=VISHNUDAS PUNDLIKRAO GHODKE
Date: 2024.06.27 13:32:32 +05'30'

**( वि. पुं. घोडके )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई,
२) मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
३) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
४) मा. विरोधी पक्षनेता विधानपरिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
५) मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
६) मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
७) सर्व सन्माननीय विधानपरिषद / विधानसभा सदस्य व संसद सदस्य,
८) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव /सचिव,
९) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
१०) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई,
११) मंत्रालयाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग / कार्यालय प्रमुख,
१२) सर्व महानगरपालिका / नगरपालिका,
१३) सर्व जिल्हा परिषदा / पंचायत समित्या / ग्रामपंचायती,
१४) सर्व मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
१५) मा. मंत्री (सामाजिक न्याय) यांचे खाजगी सचिव,
१६) मा. राज्यमंत्री (सामाजिक न्याय) यांचे खाजगी सचिव,
१७) मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई ४०००३२,
१८) आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे,
१९) सर्व प्रादेशिक उप आयुक्त, समाज कल्याण विभाग,
२०) सर्व सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण विभाग,
२१) सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद,
२२) भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ. बॅरेक नं. १, योगक्षेमसमोर, वसंतराव नाईक चौक, नरिमन पॉईन्ट, मुंबई ४०० ०२१,
२३) इंडियन नॅशनल कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश, कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई ४०० ०२५,

२४) राष्ट्रवादी काँग्रेस पार्टी, राष्ट्रपती भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईन्ट, मुंबई ४०००२१,
२५) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई ४०० ०२८,
२६) बहुजन समाज पार्टी, महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई ४०००१३,
२७) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई ४०० ०१३,
२८) भारतीय कम्युनिस्ट (मार्क्सवादी) पार्टी, महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई ४०० ०१३,
२९) महाराष्ट्र नवनिर्माण सेना, राजगड, मातोश्री टॉवर, शिवाजी पार्क, दादर, मुंबई ४७०० ०२८,
३०) निवड नस्ती.